**अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-“ब” (राजपत्रित) या संवर्गातून उपसंचालक, गट-“अ” (राजपत्रित) या संवर्गातील पदावर पदोन्नतीने नियुक्ती**

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोनि-१११९/प्र.क्र.११/का.१४२७

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ११ मार्च, २०२०.

**शासन आदेश :-**

अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, गट-“ब” (राजपत्रित) संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना उपसंचालक, गट-“अ” संवर्गातील (सुधारित वेतन मॅट्रिक्समधील वेतन स्तर रुपये S-२०: ५६,१००-१,७७,५००/-) या पदावर खालील परिच्छेद -२ येथे नमूद केलेल्या अटी व शर्तीच्या अधीन राहून या आदेशाच्या निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. सदरहू पदोन्नतीनंतरची त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, यांचे नाव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | संचालनालयाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १ | श्री.र.वि.गावित, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, मुंबई शहर | अ.ज. | कोकण-२ | कोकण-२ | वरिष्ठ संशोधन अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| २ | श्री.सु.चं.बहिरम, जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, नंदूरबार | अ.ज. | नाशिक | नाशिक | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे |
| ३ | श्री.गो.का.शिंदे, संशोधन अधिकारी (निरिक्षण), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, नाशिक | अ.ज. | नाशिक | नाशिक | उपसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, नाशिक |

| अ.क्र. | संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, यांचे नाव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | संचालनालयाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| ४ | श्री.ब.चा.चौरे, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, धुळे | अ.ज. | नाशिक | नागपूर | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, चंद्रपूर |
| ५ | श्री.सं.म.पाठक, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, नागपूर | खुला | नागपूर | नागपूर | वरिष्ठ संशोधन अधिकारी, अपर आयुक्त आदिवासी विकास यांचे कार्यालय, नागपूर |
| ६ | श्री.एस.बी.व्हरसाळे, संशोधन अधिकारी (मूल्यमापन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, नाशिक | खुला | औरंगाबाद | औरंगाबाद | उपसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, औरंगाबाद |
| ७ | श्री.चं.प्र.पावसे, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे | खुला | कोकण-२ | कोकण-२ | उपसंचालक (मूल्यमापन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| ८ | श्री.भू.वि.देशपांडे, जिल्हा सांख्यिकी अधिकारी, जिल्हा सांख्यिकी कार्यालय, कोल्हापूर | खुला | कोकण-२ | कोकण-२ | उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई |
| ९ | श्रीमती सा.सं.पराडकर, संशोधन अधिकारी, नियोजन विभाग (रोजगार हमी योजना), मंत्रालय, मुंबई | खुला | कोकण-१ | कोकण-१ | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर |
| १० | श्री.श.ना.माळी, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, सातारा | खुला | कोकण-२ | अमरावती | विशेष कार्य अधिकारी, विभागीय आयुक्तांचे कार्यालय (तीर्थक्षेत्र विकास कार्यक्रम कक्ष), अमरावती |
| ११ | श्री.सु.तु.सुर्यवंशी, संशोधन अधिकारी (इ.आ.सं.कें.), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई | खुला | कोकण-२ | औरंगाबाद | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, जालना |

| अ.क्र. | संशोधन अधिकारी/ सांख्यिकी अधिकारी, यांचे नाव व विद्यमान पदस्थापना | प्रवर्ग | पसंतीचा विभागीय संवर्ग | संचालनालयाने वाटप केलेला विभागीय संवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापना करण्यात आली ते पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) |
| १२ | श्री.एस.सी.लाड, संशोधन अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई | खुला | कोकण-२ | अमरावती | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, बुलढाणा |
| १३ | श्री.अ.वि.सुने, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती | खुला | अमरावती | अमरावती | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ |
| १४ | श्री.रा.ग.सोनखासकर, सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, अमरावती | खुला | अमरावती | अमरावती | जिल्हा नियोजन अधिकारी (मानव विकास), मानव विकास समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम |
| १५ | श्रीमती सु.अ.आंबरे, संशोधन अधिकारी (मूल्यमापन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, अमरावती | खुला | कोकण-२ | अमरावती | जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, वाशिम |

२. सदर पदोन्नती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

१) सदर आदेशानुसार पदोन्नतीच्या पदाचा पदभार स्वीकारावा व तसे केल्याबद्दलचे कार्यभार हस्तांतरण प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे. तसेच त्याची एक प्रत संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना अग्रेषित करावी. पदोन्नती स्वीकारावयाची नसल्यास त्याबाबत लेखी स्वरुपात शासनास कळवावे.

२) मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिनांक ४/८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय विधि व न्याय विभागाने दिनांक २८/१२/२०१७ रोजी दिले आहेत. त्यानुसार तूर्तास पदोन्नतीच्या कोटयातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना

सेवाज्येष्ठता यादीमध्ये मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५/५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करावी, अशा सूचना सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.१६-ब यांनी दिनांक २९/१२/२०१७ च्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार संबंधित अधिकाऱ्यांना उप संचालक पदावरील पदोन्नती, मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ च्या अधीन पदोन्नतीच्या कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) पदोन्नतीच्या पदावर रुजू झाल्यानंतर संबंधित अधिकाऱ्यांनी ७ दिवसांच्या आत त्यांचे ई-प्रोफाईल सुधारित करुन त्याची प्रत शासनास तसेच अर्थ व सांख्यिकी संचालनालयास सादर करावी. प्रत सादर न केल्यास त्यांचे चालू महिन्याचे वेतन अदा केले जाणार नाही.

५) या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

६) मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेल्या मूळ अर्ज क्रमांक ६९४/२०१८ संदर्भातील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नती देण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११५१५४४२३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tushar Purushottam Hirlekar

Digitally signed by Tushar Purushottam Hirlekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6dd848a31422ed36ba4503d4744b6dc20833c851babace12b16b7bba3f67cca2, cn=Tushar Purushottam Hirlekar
Date: 2020.03.11 17:11:31 +05'30'

**( तु. पु. हिर्लेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संबंधित अधिकारी (मार्फत: अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई)

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. मा.मंत्री (नियोजन)/ मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,
३. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र राज्य विधानसभा/ विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
४. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राने)
५. आयुक्त, मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद

६. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक
७. आयुक्त, विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
८. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी यांचे कार्यालय, मुंबई शहर/ नंदूरबार/ धुळे/ नाशिक/ चंद्रपूर/ नागपूर/ औरंगाबाद/ पुणे/ कोल्हापूर/ पालघर/ सातारा/ अमरावती/ बुलढाणा/ जालना/ वाशिम/ यवतमाळ
९. अपर आयुक्त, अपर आयुक्त आदिवासी विकास यांचे कार्यालय, नागपूर
१०. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
११. प्रशासकीय अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१२. उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (का.१२/१६-ब), मंत्रालय, मुंबई
१३. सर्व सह सचिव/ उप सचिव/ विशेष कार्य अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
१६. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई/ नाशिक/ पुणे/ औरंगाबाद/ नागपूर/ अमरावती
१७. उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१८. लेखा अधिकारी, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२१. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नंदूरबार/ धुळे/ नाशिक/ चंद्रपूर/ नागपूर/ औरंगाबाद/ पुणे/ कोल्हापूर/ पालघर/ सातारा/ अमरावती/ जालना/ बुलढाणा/ यवतमाळ/ वाशिम
२२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
२३. निवड नस्ती